अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावरुन मुख्य अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीउपरांत पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१३२०/ प्र.क्र. १८१/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ नोव्हेंबर, २०२१

**संदर्भ :** सा. बां. विभाग शासन आदेश क्र.: पीओजी-१३२०/प्र.क्र. १८१/सेवा-१, दिनांक २.९.२०२१

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन शासन आदेशान्वये, सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील श्री. प्र. शां. औटी, अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, पुणे यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मुख्य अभियंता (स्थापत्य) या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली आहे. पदोन्नतीउपरांत मुख्य अभियंता (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत असलेले ठिकाण | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. प्र. शां. औटी | अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, पुणे | सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे | श्री. स. शं. साळुंखे यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी |

२. श्री. प्र. शां. औटी यांच्या संदर्भाधीन पदोन्नती आदेशातील अटी-शर्ती लागू राहतील.

३. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. औटी यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, श्री. औटी यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

४. श्री. औटी यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. श्री. औटी हे पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे त्यांचे लक्ष वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

५. श्री. औटी यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात येईल.

६. श्री. औटी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११११११५०९१४३५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pooja Bhaskar Udawant

Digitally signed by Pooja Bhaskar Udawant
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, cn=Pooja Bhaskar Udawant
Date: 2021.11.11 15:12:52 +05'30'

**( पु. भा. उदावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती/ नागपूर / राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता व सह सचिव, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
६. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
९. श्री. प्र. शां. औटी, अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, पुणे,
१०. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
११. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१४. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१७. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१८. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१९. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२०. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२१. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. कार्यासन प्रशा-२, आस्था-१/२, रोखशाखा, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. निवडनस्ती.